राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) अंतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) योजनेअंतर्गत अंमलबजावणीकरिता सन २०१८-१९ च्या अनुसूचित जमाती प्रवर्गाचा अखर्चित निधी पुनरुज्जीवित करुन चालू वर्षी विनियोगात आणण्यास मान्यता देवून निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राशेअ-४४१९/प्र.क्र.१००/८-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: १२ फेब्रुवारी, २०२०

संदर्भ:-

१. केंद्र शासनाने www.agricoops.nic.inया सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सुचना.
२. शासन निर्णय क्रमांक ०४१८/प्र.क्र.१५५/१४ अे, दि. २७ एप्रिल, २०१८
३. शासन निर्णय क्रमांक शाशेअ ४४१८/प्र.क्र.८१/८ अे, दिनांक २१.०६.२०१८
४. शासन निर्णय क्रमांक शाशेअ ४४१८/प्र.क्र.८२/८ अे, दिनांक ४.०८.२०१८ व दिनांक ११.०३.२०१९
५. केंद्र शासनाचे पत्र क्र.९-७/२०१६-B&A, दिनांक ५ एप्रिल, २०१९
६. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.जा.क्र/कृआआ-२०१७/कोक्षवि/निधीपूवि/प्र.क्र. २३/१४१/रासक, दि.२२ ऑगस्ट, २०१९
७. आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्रमांक बीयुडी २०१९/प्र.क्र.७/कार्यासन-६,दि. १.०२.२०२०

प्रस्तावना:-

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास [Rain fed Area Development (RAD)] योजनेची अंमलबजावणी करण्यात येत आहे. त्याकरिता केंद्र व राज्य हिश्श्याचे अनुदानाचे प्रमाण ६०:४० असे आहे. सन २०१८-१९ या वर्षासाठी केंद्र शासनाने केंद्र हिश्श्यापोटी रु. २३१२.८७ लक्ष एवढा निधी उपलब्ध करुन दिला होता. सदर निधीपैकी र १९५३.०५ लक्ष एवढा निधी खर्च झाला असून रु. ३५९.८२ लक्ष निधी दिनांक १ एप्रिल, २०१९ रोजी अखर्चित आहे. सदर अखर्चित निधी सन २०१९-२० या वर्षत खर्च करण्यासाठी केंद्र शासनाने संदर्भाधीन दिनांक ५ एप्रिल, २०१९ च्या पत्रान्वये पुनरुज्जीवित करुन दिलेला आहे.

अखर्चित निधीमध्ये अनुसूचित जमाती या प्रवर्गाचा रु. ८९.०५ लक्ष निधीचा समावेश आहे. सदर निधी व त्याप्रमाणात समरुप राज्य हिश्श्याचा रु. ५८.३७ लक्ष असा एकूण रु. १४७.४२ लक्ष निधी सन २०१९-२० या वर्षात पुनरुज्जीत करुन सदर निधी आयुक्त (कृषि) यांना वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (बीडीएस) उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता अंमलबजावणी करण्यासाठी सन २०१८-१९ या वर्षातील केंद्र हिश्श्याचा अखर्चित निधी रु. ८९.०५ लक्ष (रुपये एकोणनव्वद लक्ष पाच हजार फक्त) व राज्य हिस्सा रु. ५८.३७ लक्ष (रुपये अठ्ठावन्न लक्ष सदतीस हजार फक्त) असा एकूण रु.१४७.४२ लक्ष (रुपये एक कोटी सत्तेचाळीस लक्ष बेचाळीस हजार फक्त) सन २०१९-२० या वर्षात खर्च करण्यासाठी पुनर्जिवित करुन आयुक्त(कृषि) यांना वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (बीडीएस) वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर रु. १४७.४२ लक्ष निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| **अनुसूचित जमाती** | **मागणी क्र.टी-५,**<br>२४०१-पीक संवर्धन,<br>(७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना,<br>(०१)(१९) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान-अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामान बदल शाश्वत शेती सनियंत्रण, प्रतीमानकरण व नेटवर्किंग कार्यक्रम (केंपुयो) (केंद्र हिस्सा-६०%) (अनुसूचित जमाती) (२४०१ए५३९) ३३ अर्थसहाय्य. | **मागणी क्र.टी-५,**<br>२४०१-पीक संवर्धन,<br>(७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना,<br>(०१)(२०) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान-अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामान बदल शाश्वत शेती सनियंत्रण, प्रतीमानकरण व नेटवर्किंग कार्यक्रम (केंपुयो) (राज्य हिस्सा-४०%) (अनुसूचित जमाती) (२४०१ए५४८) ३३ अर्थसहाय्य. |

३. या शासन निर्णयाव्दारे उपलब्ध करून देण्यात येत असलेल्या रू.१४७.४२ लक्ष निधीचे सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने, निधी आहरण व संवितरण करण्यासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संतिरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २ | विभागीय स्तर | संबंधित विभागीय कृषी सहसंचालक | संबंधित विभागीय कृषी सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी. |
| ३ | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

४. अनुदानाची रक्कम PFMS प्रणालीद्वारे शेतकऱ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात जमा करावी .

५. सदर निधी खर्च करतांना राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास घटकाच्या केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोर पालन करण्यात यावे.

६. सदर निधी खर्च करताना तो विहीत कार्यपद्धती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे / प्रकियाचे / वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/C.V.C. तत्वानुसार/ प्रचलित शासन निर्णय/ नियम/ परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

७. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची एक प्रत राज्य शासनास पाठविण्यात यावी.

८. प्रत्येक महिन्याला योजनेची भौतिक आणि आर्थिक प्रगती याबाबतची माहिती अद्ययावत करण्यात यावी व राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांसोबतच्या परिशिष्ट-३ मध्ये भरण्यात यावी व सदरची माहिती राज्य शासनाकडेसुद्धा पाठविण्यात यावी.

९. योजनेचा सविस्तर त्रैमासिक प्रगती अहवाल पुढील त्रैमासिकाच्या पहिल्या महिन्यांच्या १० तारखेपर्यंत त्याचप्रमाणे वार्षिक प्रगती अहवाल आर्थिक वर्ष संपल्यानंतर ३ महिन्यांच्या कालावधीत कृषी व सहकार विभाग, कृषी मंत्रालय, भारत सरकार यांच्याकडे तसेच राज्य शासनाकडे पाठविण्यात यावा.

१०. कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाच्या उद्दिष्टपूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन अ.क्र. १ येथे नमुद केलेल्या केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असलेल्या सदर घटकाच्या मार्गदर्शक सूचना तसेच उपरोक्त नमूद अटी व शर्ती विचारात घेऊन उद्दिष्ट निहाय सविस्तर मार्गदर्शक सुचना क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात.अनुसूचित जमाती प्रवर्गसाठीचा निधी अनुसूचित जमाती लाभार्थ्याकरीता खर्च करण्यात यावा.

११. उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टये, अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना योजनेचा लाभ कोणत्या स्वरुपात देण्यात आला इ.माहिती आदिवासी विकास विभागास सादर करण्यासाठी, शासनास सादर करण्यात यावी.

१२. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांचा अनौपचारीक संदर्भ क्र. ३११/२०१९/अर्थोपाय, दि. १८ जानेवारी २०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस तसेच अ.क्र. ७ येथील आदिवासी विकास विभागाच्या क्रमांक बीयुडी २०१९/प्र.क्र.७/कार्यासन-६,दि. १.०२.२०२० च्या शासन निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१३१२२७४११९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Bharati Dinesh Dhuri

Digitally signed by Bharati Dinesh Dhuri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ac65e55bc2f86ec37c6f25108b6605bc20e71b4742dd20d7e8f5e14cda6a2a7f, cn=Bharati Dinesh Dhuri
Date: 2020.02.13 12:29:14 +05'30'

**(भारती दि. धुरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, अंधेरी,मुंबई.
४. जिल्हाधिकारी (सर्व)
५. मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषदा)
६. मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे
७. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०. व्यवस्थापकीय संचालक, जिल्हा अग्रणी बँक (बँक ऑफ महाराष्ट्र, लोकमंगल ,पुणे)
११. सर्व कृषि विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषि अधिकारी/सर्व तालुका कृषि अधिकारी/सर्व मंडळ कृषि अधिकारी
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
१४. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१५. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
१६. सहायक संचालक(लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१७. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी
१८. उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
१९. उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२०. सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२१. वित्त विभाग (का. व्यय-१/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय,मुंबई
२२. आदिवासी विकास विभाग (का.६), मंत्रालय, मुंबई
२३. निवडनस्ती ८-अे